**डॉ.ए. पी. जे. अब्दुल कलाम यांचा दिनांक १५ ऑक्टोबर हा जन्मदिन "वाचन प्रेरणा दिवस" म्हणून साजरा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०१८/(प्र.क्र.५९/१८)/ समन्वय**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑक्टोबर,२०१८.

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्रमांक:बैठक-२४१३/(प्र.क्र.१४०/१५)/ समन्वय, दि.९ ऑक्टोबर, २०१५
२) शासन परिपत्रक क्रमांक:बैठक-२४१३/(प्र.क्र.१४०/१५)/ समन्वय, दि.७ ऑक्टोबर, २०१७

**शासन परिपत्रक :**

डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्या स्मृती जतन करण्याच्या अनुषंगाने त्यांचा दि. १५ ऑक्टोबर हा जन्मदिन, **"वाचन प्रेरणा दिवस"** म्हणून साजरा करण्यात येणार आहे. विद्यार्थ्यांमध्ये व समाजाच्या इतर घटकांना वाचनाची आवड व प्रेरणा निर्माण होणे व वाचनाचे महत्व जाणून घेण्यासाठी दि. १५ ऑक्टोबर, २०१५ हा "**वाचन प्रेरणा दिवस**" म्हणून साजरा करण्याबाबत संदर्भाधीन परिपत्रकानुसार कळविण्यात आले आहे. शासन परिपत्रक क्रमांक : बैठक-२४१३/(प्र.क्र. १४०/१५)/समन्वय, दिनांक ९ ऑक्टोबर, २०१५ मधील सूचनांचे अनुपालन करण्याबरोबरच हा उपक्रम राबविण्यासाठी खालील उपक्रमांचे देखील आयोजन करण्यात यावे :

१) पुष्पगुच्छ नाही पुस्तक (बुके नाही बुक) - सार्वजनिक कार्यक्रमात पाहूण्यांना पुष्पगुच्छाऐवजी पुस्तक भेट देण्याच्या शासन निर्णयाची अंमलबजावणी व प्रसार.
२) प्रयोग.
३) वाचन प्रेरणा किंवा वाचन संस्कृतीशी संबंधित विषयावर व्याख्यान/चर्चासत्र/परिसंवाद/कार्यशाळा घ्याव्यात.
४) महान व्यक्तींच्या मौलीक विचारांचे सामुहिक वाचन करण्यात यावे.
५) गरजू व वाचनाची आवड असलेल्या विद्यार्थ्यांना पूर्वमागणी नुसार मोफत पुस्तक वाटप करण्यात यावे.
६) प्रशासनामध्ये उपयुक्त पुस्तकांचे कर्मचारी व अधिकाऱ्यांना पुस्तक भेट देण्यात यावे.
७) लेखक आपल्या भेटीला-लेखकांशी संवाद या अंतर्गत लेखकांशी त्यांच्या लेखनाविषयी, त्यांच्या कलाकृतीविषयी चर्चा किंवा त्यांची प्रकट मुलाखत घेण्यात यावी.
८) वृत्तपत्र वाचन-अग्रलेख व प्रमुख लेखांचे वाचन करण्यात यावे.
९) ई-बुक चे सामुहिक वाचन करण्यात यावे.
१०) एखाद्या सुप्रसिध्द पुस्तकातील महत्वाच्या/निवडक पानांचे सामूहिक वाचन (पारायण) करण्यात यावे.
११) वाढदिवशी एकमेकांना पुस्तकभेट देण्याचे आवाहन करण्यात यावे.
१२) शाळा, महाविद्यालय, ग्रंथालय व इतर संस्थांनी आपल्या परिसरात "डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम वाचनकट्टा" निर्माण करावा.
१३) स्व.गदिमा, पु.ल.देशपांडे व राम गणेश गडकरी यांनी लिहिलेले व त्यांच्यावर अन्य लेखकांनी लिहिलेल्या ग्रंथांचे प्रदर्शन ग्रंथालय संचालनालयांतर्गत ४३ शासकीय ग्रंथालये आणि राज्यातील १२,१४८ शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयात आयोजित करण्याबाबत सूचित करण्यात यावे. ('अ' वर्ग - ३३४, 'ब' वर्ग - २१२०, 'क' वर्ग - ४१५३ व 'ड' वर्ग - ५५४१)
१४) प्रत्येक ग्रंथालयातून एक महिला, एक पुरुष व एक ज्येष्ठ नागरिक यांना ग्रंथभेट देऊन सत्कार करण्यात यावा.

१५) वाचनध्यास या उपक्रमांतर्गत सलग पाच तास, सहा तास, आठ तास, दहा तास वाचन करणाऱ्यास ग्रंथभेट देऊन सत्कार करण्यात यावा. कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांनी एकत्रितपणे बसून आपला सकाळी १२.०० ते १.०० हा एक तास वेळ वाचनासाठी “वाचनध्यास” म्हणून व्यतित करण्याबाबत सूचित करण्यात यावे.

१६) सलग काही वेळ (शांतपणे,एकट्याने) वाचनाचा उपक्रम (विद्यार्थी/वाचक)(एखाद्या वर्गात/ सभागृहात बसून एकट्याने पुस्तक वाचतील)

१७) डॉ.ए.जी.जे.अब्दुल कलाम यांचा जीवनपट प्रदर्शित करणे. (Biography)

१८) डॉ.ए.जी.जे.अब्दुल कलाम यांच्या छायाचित्रांचे प्रदर्शन भरविणे. (Photo Gallery)

१९) पुस्तकांचे गांव (भिलार, ता. महाबळेश्वर, जि. सातारा) या उपक्रमाची माहिती व्हावी, या उद्देशाने नजीकच्या काळात सर्व संचालनालये व अधिनस्त कार्यालयातील अधिकाऱ्यांसाठी “अभ्यास सहली” चे आयोजन करण्यात यावे.

२०) संकल्प - महिन्यातील एक दिवस “नो गॅजेट डे” म्हणून कृतीत आणण्याचे आवाहन. (“नो गॅजेट डे” मोबाईल, व्हॉटस्ॲप, फेसबुक, ट्विटर न वापरता तो वेळ वाचनासाठी देणे.)

२. वाचन प्रेरणा दिवसाच्या निमित्ताने डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांचे लेखन व विचार महत्वाचे आहेतच त्याचबरोबर एकूण वाचन संस्कृती व वाचन प्रेरणा वाढीस लागणे याकरिता दि. १५ ऑक्टोबर हा दिवस “वाचन प्रेरणा दिवस” म्हणून नियोजनबद्वरितीने साजरा करण्यात यावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१००६११२७२८६१०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraya Rambhau Kahar

Digitally signed by Dattatraya Rambhau Kahar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc29789a0057acb8ed170e1748553c17db300239c347be5264afbff5eb51fcac, cn=Dattatraya Rambhau Kahar
Date: 2018.10.06 11:29:34 +05'30'

**(द.रा.कहार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेता (विधान सभा/परिषद), विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
५. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. मा. सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
७. मा.सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
८. सर्व सह/उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
१०. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१३. संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१४. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
१५. निवडनस्ती.